॥ १०६ ॥ भला गलेलठ्ठ असा दुसरा हरिण येईल त्याला मारलास तर तुझ्या कुटुंबाची तृप्ति तरी होईल. ॥१०७॥ हें तिचें भाषण लुब्धकानें ऐकून काय करावें असा तो विचार करूं लागला. हरिणी तर निःसंशय बोलते तेव्हां तसा निश्चय करावा ॥ १०८ ॥ इत्यादि

अत्यंतस्थूलपीनांगोमृगोऽन्योत्रागमिष्यति ॥ तंहत्वातेकुटुंबस्यतृप्तिर्नूनं भविष्यति ॥ १०७ ॥ तयोक्तंलुब्धकःश्रुत्वाकिंकरोमीत्यचिंतयत् ॥ मृगीब्रूतेह्यसंदिग्धंनिश्चयोऽयंपरंमम ॥ १०८ ॥ चिंतयित्वेतिसप्राहमृगीं कामातुरांतदा ॥ कुरुप्रतिज्ञांसत्यांत्वंप्रत्ययोमेयथाभवेत् ॥ १०९ ॥ तस्यतद्वचनंश्रुत्वामृगीशोकसमाकुला ॥ चक्रेसत्यप्रतिज्ञांतुव्याधस्याग्रे पुनःपुनः ॥ ११० ॥ ॥ ॥

चिंतन करून त्या वेळीं कामातुर अशा त्या मृगीला ह्मणतो हे मृगि, तूं माझ्या जवळ पुनः येईन अशी सत्य प्रतिज्ञा कर कीं ज्या योगानें मला विश्वास वाटेल. ॥ १०९ ॥ हें त्याचें वचन ऐकून ती हरिणी शोकाकुल झाली आणि व्याधाजवळ सत्य प्रतिज्ञा करूं लागली

॥ ११० ॥ मृगी ह्मणते–जो जातीचा क्षत्रिय असून युद्धप्रसंग पाहून पळून जातो त्याचें पाप जर मी खोटें बोलेन तर मला लागेल ॥ १११ ॥ जे नित्य परद्रव्य हरण करणारे, कपटी, असूया करणारे, व जे तलाव, विहिरी, रथ व गाईचे गोठे मोडणारे ॥ ११२ ॥ चांगले मार्ग मोडणारे, सर्व प्राण्यांला भीति करणारे व जो सन्मार्ग टाकणारा, पशु

मृग्युवाच ॥ ॥ क्षत्रियस्तुरणंदृष्ट्वासंग्रामाद्योनिवर्तते ॥ तेनपापेनलिप्येहंयद्येतदनृतंवदे ॥१११॥ परद्रव्यरतानित्यंमायावंतोभ्यसूयकाः ॥ भेदयंतितडागानिवापीरथगवामपि ॥ ११२ ॥ मार्गस्थानंचयेघ्नंतिसर्वसत्वभयंकराः ॥ परित्यजतिसन्मार्गंपशून्भृत्यांश्वबाधते ॥ ११३ ॥ ब्राह्मणान्निंदतेयश्चतथैवाश्रमनिंदकः ॥ तेनपापेन० ॥ ११४ ॥ ॥

व नोकरांला पीडा देणारा, ॥ ११३ ॥ जो ब्राह्मणांची निंदा करणारा व ब्रह्मचर्य, गृहस्थाश्रम, वानप्रस्थ आणि संन्यासी या आश्रममर्यादेची निंदा करणारा याचें तें पाप खोटें बोलेन तर मला लागेल ॥ ११४ ॥

हें तिचें भाषण ऐकून त्या हरिणीलाही सोडून दिली. नंतर ती उदक प्राशन करून आपल्या स्थानास गेली ॥ ११५ ॥ याप्रमाणें जाळयाच्या मध्यभागीं असतांना त्याचा दुसरा प्रहरही निघून गेला. नंतर पुनः बेलाचीं पानें खुंटून खालीं टाकूं लागला ॥ ११६ ॥

श्रुत्वैवंवचनंतेनसापिमुक्तामृगीतदा ॥ जलंपीत्वातुबहुशोगतासद्योयथा गतं ॥११५॥ जालमध्येस्थितस्यास्यद्वितीयःप्रहरोगतः ॥ त्रोटित्वाबिल्व पत्राणितथैवपुनरक्षिपत् ॥११६॥ पीडितस्तीव्रशीतेनक्षुधयागृहचिंतया ॥ शिवशिवेतिजल्पन्वैननिद्रामुपलब्धवान् ॥११७॥ द्वितीयेप्रहरेप्येवंकृतंते नशिवार्चनं ॥ वीक्षतेचदिशःसर्वाजीवनार्थंवरानने ॥११८॥ सौभाग्यबल दर्पाढ्योमृगस्तावत्समागतः॥लुब्धकेनाथदृष्टोऽसौहरिणश्चंचलेक्षणः ॥११९॥

अतिशय थंडीनें, क्षुधेनें व गृहचिंतेनें शिव शिव उच्चार करतां करतां त्याला झोंप लागली नाहीं ॥११७॥ दुसऱ्या प्रहरींही याप्रमाणें त्याला शिवाचें पूजन घडलें आणि उपजीविकेसाठीं सर्व दिशांकडे पाहूं लागला ॥ ११८ ॥ एवढ्यांत एक आपल्या सौंदर्याच्या व सामर्थ्याच्या

गर्वानें युक्त असा मृग तेथें आला. ज्याची चंचल दृष्टि आहे असा तो हरिण व्याधानें पाहिला ॥ ११९ ॥ तो हरिण हरिणीच्या शोधाकरितां दशदिशांकडे पाहत आहे अशा त्या हरिणाला पाहून व्याधानें संतुष्ट अंतःकरण होऊन धनुष्याची प्रत्यंचा कानापर्यंत ओढून शरसंधान केलें ॥ १२० ॥ आतां तो बाण सोडणार एवढ्यांत हरिणानें व्याधाला पाहिलें.

विलोकयन्दिशः सर्वा मार्गमाणो मृगीपदं ॥ तं दृष्ट्वा बाणमाकृष्य ह्याकर्ण तुष्टमानसः ॥ १२० ॥ तस्मिन्मुंचति वै यावत्तावद्दृष्टो मृगेण सः ॥ कालरूपं तु तं दृष्ट्वा मृगश्चिंतां परां ययौ ॥ १२१ ॥ निश्चितं भविता मृत्युर्गोचरेऽस्य गतोस्मि यत् ॥ भार्या प्राणसमा मेऽद्य व्याधेनेह निपातिता ॥ १२२ ॥

तों तो भयंकर कालरूपी दिसत आहे असें पाहून फार चिंतेंत पडला ॥ १२१ ॥ आणि ह्मणतो ज्यापेक्षा याच्या समोर आलों त्यापेक्षां खरोखर मृत्यु ओढवला. माझी प्राणाहून प्रियभार्या व्याधानें येथेंच मारली असावी ॥ १२२ ॥

तिच्या विरहानें मला मृत्यु येईल. हाय हाय. स्त्रीविरहदुःख येण्याजोगें काय मीं पाप केलें होतें ॥ १२३ ॥ संसारांत भार्येसारखें दुसरें सौख्य नाहीं, मग तें घरांत असो किंवा अरण्यांत असो. तिच्यावांचून धर्म, अर्थ, काम यांपैकीं कोणताही पुरुषार्थ घडत नाहीं. ॥ १२४ ॥ भार्या जवळ असेल तर झाडाखालीं राहिला तरी तें घर आहे आणि तिच्या-

तयाविरहितस्यापिममम्रृत्युर्भविष्यति ॥ हाहाकिंनुकृतंपापंयद्भार्यादुःख मागतं ॥ १२३ ॥ नहिभार्यासमंसौख्यंगृहेवाविपिनेवा ॥ तयाविना नधर्मोस्तिनार्थकामौविशेषतः ॥ १२४ ॥ वृक्षमूलेपिदयितायत्रतिष्ठतित द्गृहं ॥ प्रासादोपितयाहीनःकांताराददतिरिच्यते ॥१२५॥ धर्मार्थकामका र्येषुभार्यापुंसःसहायिनी ॥ विदेशगमनेवापिसैवविश्वासकारिणी ॥१२६॥

शिवाय मोठ्या हवेलींत राहिला तरी तें अरण्य होय ॥ १२५ ॥ धर्म, अर्थ, कामसंबंधी कोणतेंही कार्य करणें झालें तरी भार्या ही पुरुषाला सहायिनी आहे. प्रवासांत गेला तरी विश्वासू भार्याच होय ॥ १२६ ॥

भार्येसारखा अन्य बंधु नाहीं, भार्येसारखें सौख्य नाहीं. आर्त मनुष्याला सुखजनक असें भार्येशिवाय दुसरें औषध नाहीं ॥१२७॥ ज्याच्या घरांत प्रियभाषिणी साध्वीभार्या नसेल त्याला अरण्यांत जाण्याचें कारण नाहीं, तें घर अरण्यासारखेंच आहे ॥ १२८ ॥ माझी

नास्तिभार्यासमोबंधुर्नास्तिभार्यासमंसुखं ॥ नास्तिभार्यासमंलोकेनरस्यार्तस्यभेषजं ॥ १२७ ॥ यस्यभार्यागृहेनास्तिसाध्वीचप्रियवादिनी ॥ तेनारण्यंनगंतव्यंयथारण्यंतथागृहं ॥ १२८ ॥ एकाप्राणसमामेऽभूद्द्वितीयाप्राणदामम ॥ ताभ्यांविरहितस्याद्यजीवितंनिष्फलंमम ॥ एवंविचिंत्यसशनैर्लुब्धकंवाक्यमब्रवीत् ॥ १२९ ॥ ॥ मृगउवाच ॥ पृच्छामित्वांशृणुव्याधआमिषाहारजीवन ॥ आगतंहरिणीयुग्मंकेनमार्गेणतद्गतं ॥ १३० ॥

एक भार्या प्राणासारखी व दुसरी प्राण देणारी, त्या दोघींविरहित वांचणें निरर्थक आहे. असा विचार करून तो व्याधाला ह्मणतो ॥ १२९ ॥ हे मांसभक्षका व्याधा, मी तुला विचारतों तेवढें सांग. एथें दोन हरिणी आल्या होत्या त्या कोणत्या मार्गानें गेल्या ॥१३०॥

तूं तर मारल्यास नाहींना, खरें सांग. हें त्याचें भाषण ऐकून व्याधाला आश्चर्य वाटलें आणि विचार करूं लागला ॥ १३१ ॥ हा हरिणसुद्धां सामान्य नव्हे, ही कोणीतरी सर्वोत्कृष्ट देवताच असावी. असें क्षणभर ध्यान करून त्याला व्याध ह्मणतो ॥१३२॥ त्या

त्वयाविनाशितंनोवासत्यंकथयमेऽधुना ॥ तस्यतद्वचनंश्रुत्वाविस्मितः सोप्यचिंतयत् ॥ १३१ ॥ असावपिनसामान्योदेवताकाप्यनुत्तमा ॥ ध्या त्वाक्षणंसतस्याग्रेलुब्धकोवाक्यमब्रवीत् ॥ १३२ ॥ ॥ व्याधउवाच ॥ तेगतेऽनेनमार्गेणसत्यंकृत्वाममाग्रतः ॥ ताभ्यांदत्तोभोजनार्थेममत्वंनात्र संशयः ॥ अधुनात्वांहनिष्यामिनैवमोक्ष्यामिकर्हिचित् ॥ १३३ ॥ ॥ मृगउवाच ॥ तत्सत्यंकीदृशंव्याधताभ्यामुक्तंतवाग्रतः ॥ येनतेप्रत्ययो जातोमुक्तंतद्धरिणीद्वयं ॥ १३४ ॥ ॥ ॥

दोघीही माझ्यापाशीं शपथ करून याच मार्गानें गेल्या. त्यांनींच आह्मांला भोजनासाठीं तुला पाठविला असें वाटतें. आतां तुला मारतों, सोडणार नाहीं. ॥१३३॥ मृग ह्मणतो व्याधा, त्यांनीं

तुझ्यापाशीं कसी प्रतिज्ञा केली, कीं तुला विश्वास वाटून तूं दोघींलाही सोडून दिल्यास ? ॥ १३४ ॥ असा प्रश्न करतांच व्याधानें त्यांनीं केलेल्या शपथा सांगितल्या. तें ऐकून हरिणाला आनंद वाटला आणि ह्मणतो ॥ १३५ ॥ हे व्याधा, त्या दोघी हरिणींनीं सांगि-

व्याधेनकथितास्ताभ्यांशपथायेकृताःपुरा ॥ तच्छ्रुत्वावचनंप्राहहरिणोहृष्टमानसः ॥ १३५ ॥ ॥ मृगउवाच ॥ ताभ्यांव्याधयदुक्तंतेतत्करोमिनचान्यथा ॥ प्रभातेत्वद्गृहंनूनमागमिष्यामिलुब्धक ॥ १३६ ॥ भार्यांऋतुमतीमेद्यकामार्तापिचसांप्रतं ॥ गत्वागृहेद्यभुक्त्वातामनुज्ञाप्यसुहृज्जनं ॥ शपथैरागमिष्यामिश्रूयतामपरंचमे ॥ १३७ ॥ मद्देहेनास्त्यसृङ्मांसंयत्त्वंभोक्तुमभीप्ससि ॥ तद्वृथामरणंमेस्याद्यदिमांत्वंहनिष्यसि ॥ १३८ ॥

तल्याप्रमाणें, प्रातःकाळीं खरोखर तुझ्या घरीं मी येईन ॥१३६॥ माझी भार्या ऋतुमती असून कामपीडित आहे त्यापेक्षां घरीं जाऊन तिचा हेतु पुरवून सर्व सुहृदांची आज्ञा घेऊन शपथपूर्वक येईन. दुसरें सांगतों ऐक ॥ १३७ ॥ तूं मला मारून खाण्याची इच्छा करतोस

ती व्यर्थ आहे. माझ्या अंगात रक्तमास मुळीं नाहीं. जर मला मारलास तर व्यर्थ मरेन मात्र ॥ १३८ ॥ तें ऐकून व्याध ह्मणतो, हे धूर्ता, तूं मला प्रतारण करण्यासाठीं अगदीं खोटें बोलतोस. कारण ज्या जागीं आपला खरा मृत्यु आहे असें समजलें तेथें कोणता

व्याधउवाच ॥ ॥ असत्यंभाषसेधूर्तप्रतारयसिमामिह ॥ ज्ञातोमृत्युःस्फुटंयत्रतत्रगच्छतिकोऽल्पधीः ॥ १३९ ॥ ॥ मृगउवाच ॥ शपथान्वैकरिष्यामियथातेप्रत्ययोभवेत् ॥ १४० ॥ ॥ व्याधउवाच ॥ मृगत्वंशपथान्ब्रूहिविश्वासोमेभवेद्यथा ॥ यथाचप्रेषयामित्वांस्वगृहंप्रतिकामुक॥१४१॥ मृगउवाच ॥ ॥ भर्तारंवंचयेद्यास्त्रीस्वामिनंवंचयेन्नरः ॥ मित्रंचवंचयेद्यस्तुगुरुद्रोहंकरोतियः ॥ १४२ ॥ ॥

मंदमति जाईल बरें ॥ १३९ ॥ मृग ह्मणतो कीं मी तुला विश्वास वाटेल अशा शपथा करितों ॥ १४० ॥ व्याध ह्मणतो, हे कामार्ता मृगा, मला विश्वास वाटेल अशा शपथा कर ह्मणजे तुला मी घरीं जाण्यास सोडीन. ॥ १४१ ॥ मृग ह्मणतो, जी स्त्री आपल्या पतीला

फसविते, जो मनुष्य धन्याला फसवितो, जो मित्राला फसवितो, जो गुरूशीं द्रोह करितो ॥ १४२ ॥ एका पंक्तींत जेवणारांचा पंक्तिभेद करितो, जो मैत्रीची तुटातुट करतो, जो देवालयें, धर्मशाळा मोडतो ॥ १४३ ॥ जे ब्राह्मण प्रवास करणारे, क्रयविक्रय करणारे, स्नानसंध्या सोडलेले, वेदशास्त्राविरुद्ध वागणारे ॥ १४४ ॥ मद्य पिणारे, स्त्रीलंपट,

विषमंतुरसंदद्यादेकपंक्त्यांहिभुंजतां ॥ भेदयेद्यस्तुमित्राणिप्रासादंपात
येत्तथा ॥ १४३ ॥ प्रवासशीलायेविप्राःक्रयविक्रयकारिणः ॥ संध्यास्ना
नविहीनाश्चवेदशास्त्रविवर्जिताः ॥ १४४ ॥ मद्यपाःस्त्रीषुसंसक्ताःपरनिं
दारताश्चये ॥ परस्त्रीसेवकानित्यंपरपैशुन्यदूषिताः॥ १४५ ॥ शूद्रान्नभो
जिनोयेचभार्यापुत्रांस्त्यजंतिये ॥ तेनपापेन० ॥ १४६ ॥ ॥

दुसऱ्याच्या निंदेविषयीं तत्पर, नित्य परस्त्रीशीं रत, चुगलखोर ॥ १४५ ॥ शूद्रान्न सेवन करणारे, आपल्या स्त्रीपुत्रांचा त्याग करणारे यांचीं पापें जर मी पुनः आलों नाहीं तर मला लागतील ॥ १४६ ॥

मिळेल तें खाणारा, कोणतीही वस्तु विकणारा, ब्राह्मणाची निंदा करणारा, ब्राह्मणाचें धर्मवाक्य टाकून पाखंडाचें सेवन करणारा, यांचें पाप मला लागेल ॥ १४७ ॥ तिळ, तेल, तूप, मध, मीठ, गूळ, लोखंड, लाख, नानाप्रकारचे रंग ॥ १४८ ॥ दारु, मांस,

सर्वाशीसर्वविक्रेताद्विजानामपिनिंदकः ॥ विप्रवाक्यंपरित्यज्यपाखंडा भिरतःसदा ॥ तस्यपापेन० ॥ १४७ ॥ तिलांस्तैलंघृतंक्षौद्रंलवणंचतथा गुडं ॥ लोहंलाक्षादिकंसर्वंरंगान्नानाविधानपि ॥ १४८ ॥ मद्यंमांसंविषं दुग्धंनीलंचवृषभंतथा ॥ मीनंक्षारंसर्पकूटंचित्रातकफलानिच ॥ १४९ ॥ विक्रीणीतेद्विजोयस्तुधनलोभविमोहितः ॥ आदित्यंविष्णुमीशानंगणा ध्यक्षंचपार्वतीं ॥ १५० ॥ ॥ ॥

विष, दूध, निळा बैल ( वृषोत्सर्गास देणें ), मत्स्य, क्षार, सर्पकूट, चित्रातकाचीं फळें ॥ १४९ ॥ हे पदार्थ ब्राह्मण असून केवळ द्रव्यलोभानें जो विकतो. सूर्य, विष्णु, शंकर, गणपति, पार्वती ॥ १५० ॥

या देवांला सोडून घरांत इतर देवांची जो पूजा करतो त्याचीं पापें मी पुनः न येईन तर मला लागतील ॥ १५१ ॥ जो गाईला लाथ मारतो, जो सूर्योदयानंतर झोपेंतून उठतो, आईबापांची सेवा न करणारा, कांहीं निमित्त करून याचना करणारा, ॥ १५२ ॥ कंन्येचें

एतांस्त्यक्त्वागृहेमूढोयोऽन्यंप्रपूजयतेनरः ॥ तस्यपापेन० ॥ १५१ ॥ यो गांस्पृशतिपादेनउदितेर्केप्रबुध्यते ॥ मातापित्रोरभक्तश्चक्रियामुद्दिश्ययाचकः ॥ १५२ ॥ कन्याशुल्कोपजीवीचदेवब्राह्मणनिंदकः ॥ गोग्रासंहंतकारंचअतिथीनांचपूजनं ॥ येनकुर्वंतिगृहिणस्तेषांपापंभवेन्मम ॥१५३॥ वृंताकंचपटोलंचकलिंगंतुंबिकाफलं ॥ मूलकंलशुनंकंदंकुसुंभंकालशाककं ॥ एतानिभक्षयेद्यस्तुनरोवैज्ञानदुर्बलः ॥ १५४ ॥ ॥

द्रव्य घेऊन उपजीविका करणारे, देवब्राह्मणांची निंदा करणारे, जे गृहस्थधर्मी असून वैश्वदेव, गोग्रास व अतिथिपूजन न करणारे त्यांचें पाप मला लागेल ॥ १५३ ॥ वृंताक, पटोल, कलिंग, तुंबिकाफळ, मुळा, लसूण, कांदा, कुसुंभ, व काळशाक हीं अपुऱ्या ज्ञानाचा

जो भक्षण करतो ॥ १५४ ॥ त्याची शेंकडो चांद्रायणादि प्रायश्चित्तें केलीं तरी शुद्धि होत नाहीं त्यांचीं पापें मला लागतील ॥ १५५ ॥ जो वेदाक्षर स्वराशिवाय किंवा वाईट आवाजानें अवलक्षणी ह्मणतो, जो मार्गानें चालतांना वेद ह्मणतो ॥ १५६ ॥ किंवा अंत्यजांच्या

नतस्यजायतेशुद्धिश्चांद्रायणशतैरपि ॥ तेन पापेन० ॥ १५५ ॥ यःपठेत्स्वरहीनंचलक्षणेनविवर्जितं ॥ रथ्ययापर्यटन्विप्रोवेदानुद्गिरतेचयः ॥ १५६ ॥ पठतःक्वापिविप्रस्यचंडालःशृणुतेयदि ॥ वेदोपजीवीयोविप्रो लोभाच्छूद्रान्नभोजनः ॥ तस्यपापेन० ॥१५७॥ लेखकश्चित्रकर्ताचवैद्यो नक्षत्रसूचकः ॥ कूटकर्ताद्विजोयश्चविकर्मणिरतस्तथा ॥१५८॥ कूटसाक्षी मृषावादीपरद्रव्याभिलाषुकः ॥ परदाराभिगामीचतथाविश्वासघातकः १५९

कानीं जाईल असें ह्मणतो, जो वेदावर उपजीविका करतो, जो शूद्रान्न भोजन करितो त्याचीं पापें मला लागतील ॥१५७॥ लेखक, चित्र काढणारा, वैद्य, ज्योतिषी, खोट्या कपटमार्गाचा आश्रय करणारा, दुष्कर्मांत तत्पर, ॥ १५८ ॥ खोटी साक्ष देणारा, खोटें बोलणारा, परद्र-

व्याचा अभिलाष करणारा, परस्त्रीशीं आसक्त, विश्वासघातकी, ॥ १५९ ॥ दुसऱ्या संस्कारनिमित्तानें मद्यपान करणारे, निरंतर वेश्येशीं लंपट, दान देणाराचा मोड करणारा, नित्य नग्नपणें झोंपणारे, स्त्रियांना सहाय करणारांचा उत्कर्ष करणारे, ॥ १६० ॥ जी स्त्री

द्रव्येद्रव्यंविनिक्षिप्यपानकूटंसमाश्रिताः ॥ वेश्यारताःसदायेचदानदातुर्निवारकाः ॥ नग्नाःस्वपंतिनित्यंस्त्रीसहायप्रतिभोजकाः ॥ १६० ॥ भर्तारमर्थहीनंचकुरूपंव्याधिपीडितं ॥ यानपूजयतेनारीरूपयौवनगर्विता ॥ १६१ ॥ एकादशीतथामाघेयासौशिवचतुर्दशी ॥ पूर्वविद्धांनकुर्वंतितेषांपापस्यभाग्यहं ॥ १६२ ॥ अथकिंबहुनोक्तेनभोलुब्धकतवाग्रतः ॥ यदिनायामितेगेहंममासत्यंभवेत्तदा ॥ १६३ ॥ ॥

आपल्या रूपलावण्याच्या गर्वानें आपला पति दरिद्री, कुरूप व व्याधिपीडित ह्मणून त्याचा सत्कार करीत नाहीं ॥ १६१ ॥ जे एकादशी करीत नाहींत व माघाची शिवरात्री चतुर्दशी पूर्वविद्धा करीत नाहींत त्यांचीं पापें मला लागतील ॥१६२॥ हे व्याधा, तुझ्यापाशीं

जास्ती बोलून काय, जर मी पुनः तुझ्या घरीं आलों नाहीं तर सर्व असत्याचा फलभागी होईन. ॥ १६३ ॥ या त्याच्या भाषणानें तो व्याध संतुष्ट झाला व निष्पापही झाला आणि त्यानें धनुष्यबाण ठेवून मृगाला घरीं जाण्यास सोडला ॥ १६४ ॥ हे पार्वति, तो हरिणही जालपाशांतून सुटल्यामुळें संतुष्ट होऊन जलप्राशन करून पुनः अरण्यांत ज्या मार्गानें

तेनवाक्येनसंतुष्टोव्याधोवैवीतकल्मषः ॥ संहृत्यधनुषोबाणंमृगंमुक्त्वागृहंप्रति ॥ १६४ ॥ जगामप्रीतमनसामुक्तपाशोवरानने ॥ जलंपीत्वाथहरिणःप्रविष्टोगहनंततः ॥ गतोसौतेनमार्गेणगतंयेनमृगीद्वयं ॥ १६५ ॥ लुब्धकेनतदातत्रजालमध्येस्थितेनहि ॥ प्रत्यूषेबिल्वपत्राणिनिक्षिप्तानिशिवोपरि ॥१६६॥ शिवशिवेतिजल्पन्वैनिर्गतोजालमध्यतः ॥ १६७ ॥

दोनी हरिणी गेल्या होत्या त्या मार्गानें गेला ॥ १६५ ॥ व्याध जाळयामध्येंच होता तेथून त्यानें पुनः पहांटचे प्रहरीं बेलाचीं पानें तोडून शिवावर टाकलीं ॥ १६६ ॥ आणि शिव शिव असा जप करीत जाळयामधून निघाला ॥ १६७ ॥

अज्ञानानें का होईना, शिवरात्रीदिवशीं या व्याधाला उपोषण व जागरण घडलें व बिल्वपत्रांनीं शिवपूजाही घडली, त्याच्या प्रभावानें तत्काल सूर्योदयीं पापापासून मुक्त झाला ॥ १६८ ॥ आणि दशदिशांकडे भोजनाकरितां पाहूं लागला, एवढ्यांत लहान बालकासहवर्तमान दुसरी मृगी तेथें आली ॥ १६९ ॥ तिला पाहून व्याधानें पुनः धनुष्याला बाण

उदितेसूर्यबिंबेतुअज्ञानाज्जागरेकृते ॥ पापान्मुक्तोह्यसौसद्यःशिवपूजाप्रभावतः ॥ १६८ ॥ यावन्निरीक्षतेदिक्षुनिशांतेभोजनंप्रति ॥ तावच्छिशुवृताचान्यामृगीतत्रसमागता ॥ १६९ ॥ दृष्ट्वामृगींतदाव्याधोबाणंधनुषिसंदधे॥यावन्मुंचत्यसौबाणंतावत्प्रोवाचतंमृगी॥ १७० ॥ माबाणंमुंचधर्मात्मन्धर्मंपालयसुव्रत ॥ अहंत्ववध्यासर्वेषामितिशास्त्रविनिश्चयः ॥१७१॥

लावला आणि आतां बाण सोडणार एवढ्यांत हरिणी ह्मणते ॥ १७० ॥ हे धर्मशीला व्याधा, बाण सोडूं नको. धर्माचें पालन कर. शास्त्रतः पाहिलेंस तरी मी सर्वांहून अवध्य आहें ॥ १७१ ॥

एखादा राजा मृगयेसाठीं निघाला असला तरी निजलेला, मैथुनासक्त, स्तनपान करणारा, व्याधिपीडित अशा हरिणाला व लहान बालयुक्त हरिणीला कधीं मारीत नाहीं ॥ १७२ ॥ आतां कदाचित् धर्म सोडून तूं जर मला मारीत असलास तर जरा थांब. मी घरीं जाऊन माझें

शयानंमैथुनासक्तंस्तनपंव्याधिपीडितं ॥ नहिहंतिमृगंराजामृगींचशिशुनावृतां ॥ १७२ ॥ अथत्वंधर्ममुत्सृज्यमांहनिष्यसिमानद ॥ बालकंस्वगृहेमुक्त्वासखीनांचनिवेद्यवै ॥ १७३ ॥ अनुज्ञाप्यसुहृद्बंधूनागमिष्याम्यहंपुनः ॥ शपथान्वैकरिष्यामिशृणुव्याधवचोमम ॥ १७४ ॥ यास्वभर्तारमुत्सृज्यपरपुंसिरतासदा ॥ तस्याः पापेन० ॥ १७५ ॥ ॥

तानें बाळ कोणाच्यातरी स्वाधीन करून मैत्रिणीला कळवून ॥ १७३ ॥ सखेसोहिरे यांचा निरोप घेऊन पुनः येईन. व्याधा, मी शपथ करतें ऐक. ॥ १७४ ॥ जी स्त्री आपल्या पतीला टाकून परपुरुषाशीं रममाण होते तिचीं पापें पुनः न येईन तर मला लागतील

॥ १७५ ॥ हें तिचें भाषण ऐकून व्याध मनात विस्मित झाला आणि त्यानें त्या हरिणीलाही सोडली तेव्हां ती आपले घरीं निघून गेली ॥ १७६ ॥ व्याधही तें सरोवर सोडून आपले घरीं गेला आणि त्या सत्यवादी हरिणांचीं भाषणें ध्यानांत आणून ॥ १७७ ॥ ह्मणतो कीं, असा या मृगांचा नित्य घात करणारा मी कोणत्या गतीला जाईन बरें, असा विचार करीत

तस्यास्तद्वचनंश्रुत्वाव्याधोविस्मयमागतः ॥ ततोव्याधेनमुक्तासाजगाम निजमंदिरं ॥१७६॥ व्याधोपितत्सरस्त्यक्त्वाजगामस्वगृहंप्रति ॥ सर्वेषां वचनंध्यायन्मृगाणांसत्यवादिनां ॥१७७॥ एतेषांघातकोनित्यमहंयास्या मिकांगतिं ॥ एवंविंचितयन्गेहेदृष्टःक्षुधितबालकैः॥१७८॥निरामिषंतु तंदृष्ट्वाजग्मुस्तेपिनिराशतां॥ नान्नंमांसंगृहेतस्यभोजनंयेनजायते ॥१७९॥

आहे एवढ्यांत त्याला त्याच्या क्षुधाक्रांत जाहलेल्या मुलांनीं पाहिलें. ॥ १७८ ॥ तर याच्यापाशीं मांस वगैरे कांहीं नाहीं ह्मणून मुलें निराश झालीं. घरांत तर एक वेळ भोजना- पुरतें सुद्धां अन्न किंवा मांस कांहीं नव्हतें ॥ १७९ ॥

तो व्याधही हरिणांनीं खरोखर येतों ह्मणून केलेलीं शपथवाक्यें मनांत आणून आश्चर्यचकित होऊन स्वस्थ राहिला, भोजन नाहीं व निद्राही नाहीं ॥ १८० ॥ आणि ह्मणतो कीं, ते मृग शपथांनीं बद्ध आहेत त्यापेक्षां ते येतीलच, परंतु साधुमार्गाला स्मरून मी त्यांला

व्याधोपिचतदातत्रतेषांवाक्यानिसंस्मरन् ॥ नभोजनंननिद्रांचलभतेवि स्मयान्वितः ॥ १८० ॥ आगमिष्यंतितेनूनंशपथैरतियंत्रिताः ॥ तानहं नहनिष्यामिसतांव्रतमनुस्मरन् ॥ १८१ ॥ लुब्धकेनतदामुक्तोहरिणःश पथैःकृतैः ॥ स्वमाश्रमंतुसंप्राप्तोयत्रतद्धरिणीद्वयं ॥ १८२ ॥ सद्यः प्रसूतातत्रैकाद्वितीयारतिलालसा ॥ तृतीयापिसमायाताबालकैर्बहु भिर्वृता ॥ १८३ ॥ ॥ ॥

मारणार नाहीं. ॥ १८१ ॥ इकडे शपथांवर व्याधानें सोडलेला हरिण आपल्या आश्रमांत जेथें त्या दोघी हरिणी होत्या तेथें गेला ॥ १८२ ॥ त्यांतील एक मृगी तत्काल प्रसूत झाली, दुसरी कामातुर असून रतिविषयीं लालस झालेली व तिसरी बहुत बालकांसह तेथें आली

॥ १८३ ॥ अशा सर्व एकत्र जमल्या व प्रत्येकानें मरणाविषयीं निश्चय केला असून त्या व्याधाची करणी एकमेकांत बोलत आहेत ॥ १८४ ॥ त्यांत जी मृगी अत्यंत सुंदर व ऋतुमती असून रतीची इच्छा करणारी तिचा उपभोग घेऊन तो हरिण कृतकृत्य झाला आणि त्या हरिणींला ह्मणतो, ॥ १८५ ॥ तुह्मी सर्व एथेंच राहून आपले प्राण वांचवा व

सर्वाःसमेताएकत्रमरणेकृतनिश्चयाः ॥ परस्परंप्रजल्पंतिलुब्धकस्यविचेष्टितं ॥ १८४ ॥ मृगीमृतुमतींभुक्त्वारूपाढ्यांरतिलालसां ॥ कृतकृत्योऽभवत्तासांमृगोवचनमब्रवीत् ॥१८५॥ स्थातव्यमिहयुष्माभिःकर्तव्यंप्राणरक्षणं ॥ व्याघ्राद्द्विपाल्लुब्धकेभ्योबालकानांप्रयत्नतः ॥१८६॥ अहंत्वत्रसमायातःशपथैरतियंत्रितः ॥ अस्याऋतुप्रदानायपुनःसंतानहेतवे ॥१८७॥

मोठ्या प्रयत्नानें ( सावधगिरीनें ) वाघ, हत्ती, व्याध यांपासून मुलांचें रक्षण करा. ॥१८६॥ मी तर शपथांनीं गुंतलेला आहें तथापि हिला ऋतु द्यावा व पुढें संतति व्हावी ह्मणून मोठ्या प्रयत्नानें येथें आलों. ॥ १८७ ॥

स्त्री ऋतुमती असून तिला जो भोगीत नाहीं त्याला भ्रूणहत्या घडते व त्याचे सर्व धर्म निरर्थक होतात ॥ १८८ ॥ संततीनें स्वर्गप्राप्ति होते, व इहलोकीं शाश्वत कीर्ति होते. इहलोकीं व परलोकीं संतति सुख देणारी आहे ह्मणून यत्नानें तिचें संरक्षण करावें ॥ १८९ ॥

ऋतुमतींतुयोभार्यांनभुंक्तेमोहसंवृतः ॥ भ्रूणहासतुविज्ञेयोधर्मस्तस्यनिरर्थकः ॥ १८८ ॥ संतानात्स्वर्गमाप्नोतिइहकीर्तिंचशाश्वतीं ॥ संततिर्यत्नतःपाल्या सर्वसौख्यप्रदायिका ॥ १८९ ॥ अपुत्रस्यगतिर्नास्तिस्वर्गोनैवचनैवच ॥ येन केनाप्युपायेनपुत्रमुत्पादयेन्नरः ॥ १९० ॥ मयाचतत्रगंतव्यंयत्रव्याधस्यमंदिरं ॥ सत्यंहिपालनीयंस्यात्सत्येधर्मःप्रतिष्ठितः ॥ १९१ ॥ श्रुत्वाभर्तृवचस्ता स्तुप्रोचुर्धर्मयुतंवचः ॥ वयमप्यागमिष्यामस्त्वयासार्धंमृगोत्तम ॥ १९२ ॥

अपुत्राला गति नाहीं व स्वर्ग तर मुळींच नाहीं ह्मणून कोणत्याही उपायानें पुत्रासाठीं यत्न करावा ॥ १९० ॥ मला व्याधाचे घरीं जाणें भाग आहे. सत्याचें पालन करणें हें अवश्य कर्तव्य आंहे. कारण धर्म हा सत्यांतच राहतो ॥ १९१ ॥ असें पतीचें भाषण ऐकून त्या

हरिणीही धर्माला अनुसरून ह्मणतात हे मृगोत्तमा, आह्मीसुद्धां तुझ्याबरोबरच येतों ॥ १९२ ॥ हे नाथ, भर्त्यासह मरणें हें आह्मांला श्लाघ्य आहे. हे कांत, तुह्मीं अप्रिय केलेलें असें आह्मांला कांहीं स्मरत नाहीं ॥ १९३ ॥ प्रफुल्लित झालेल्या अरण्यांतून, नद्यांच्या संगमांत व पर्वतांच्या गुहांतून आपणच आमचें संरक्षण केलें आहे. आतां आपल्या पश्चात्

श्लाघ्यंमरणमस्माकंभर्त्रासहसदाप्रभो ॥ तथातेविप्रियंकांतनस्मरामः कदाचन ॥ १९३ ॥ पुष्पितेषुवनांतेषुनदीनांसंगमेषुच ॥ कंदरेषुचशैला नाभवतारमितावयं ॥ १९४ ॥ नकार्यमप्यतःकांतजीवितेनत्वयाविना ॥ नारीणांपतिहीनानांजीवितैःकिंप्रयोजनं ॥ १९५ ॥ मितंददातिहिपिता मितंभ्रातामितंसुतः ॥ अमितस्यतुदातारंभर्तारंकानपूजयेत् ॥ १९६ ॥

वांचण्यांत कांहीं अर्थ नाहीं. पतिविरहित स्त्रिया वांचून तरी उपयोग काय ॥१९४॥१९५॥ स्त्रियांला बाप असो, भाऊ असो किंवा पुत्र असो. हे नियमित ( ठराविक ) तेवढें देतात. अमित ( सर्वच ) देणारा कायतो एक पति, मग त्याचा कोण बरें सत्कार करणार नाहीं

॥ १९६ ॥ हे कुरंगम, जरी एखादे स्त्रियेपाशीं द्रव्य आहे, तिला पुत्र बहुत आहेत व सुहृदांनीं युक्त आहे तथापि ती जर पतिविरहित असेल तर बंधुवर्गाला शोचनीयच आहे. ॥ १९७ ॥ स्त्रियांला वैधव्यासारखें दुसरें दुःखच नाहीं. ज्या पतीच्या पूर्वीं मरतात त्या स्त्रिया धन्य होत ॥ १९८ ॥ वीणा जसी तारावांचून वाजत नाहीं, चक्रांवांचून रथ चालूं

अपिद्रव्ययुतानारीबहुपुत्रसुहृद्वृता ॥ शोच्यासाबंधुवर्गस्यपतिहीनाकुरंगम ॥ १९७॥ वैधव्यसदृशंदुःखंस्त्रीणामन्यन्नविद्यते ॥ धन्यास्तायोषितोयास्तुम्रियंतेभर्तुरग्रतः ॥१९८॥ नातंत्रीवाद्यतेवीणानाचक्रोभ्रमतेरथः ॥ नापतिःपूज्यतेनारीअपिपुत्रशतैर्वृता ॥१९९॥ निर्धनोव्यसनीवृद्धोव्याधितोविकलोजडः ॥ पतितःकृपणोवापिभर्तास्त्रीणांसदागतिः ॥ २०० ॥

शकत नाहीं, तसी शेंकडो पुत्रांनीं युक्त असली तथापि पतिविरहित स्त्री पूज्य नसते ॥ १९९ ॥ कदाचित् दरिद्री, व्यसनी, वृद्ध, व्याधिष्ट, एखादें इंद्रिय नसून लंगडा, जड, पतित, अथवा कृपण असला तथापि स्त्रियांला पति हीच सर्वदा गति आहे ॥ २०० ॥

स्त्रियांला पतीसारखा दुसरा धर्म नाहीं, पतीसारखा सोयरा नाहीं, पतीसारखा नाथ नाहीं, भर्ता हीच त्यांची गति आहे ॥ २०१ ॥ असा विलाप करून त्या सर्व स्त्रियांनीं मरणाविषयीं निश्चय केला, ज्यांच्या जवळ मुलें असून पतीच्या शोकानें दुःखी झाल्या आहेत. ॥ २०२ ॥ हरिणानें हें त्यांचें भाषण ऐकून चिंताग्रस्त झाला आणि मनांत विचार करतो

नास्तिभर्तृसमोधर्मोनास्तिभर्तृसमःसुहृत् ॥ नास्तिभर्तृसमोनाथःस्त्रीणांभर्तागतिःपरा ॥२०१॥ एवंविलप्यताःसर्वामरणेकृतनिश्चयाः ॥ बालकैस्तुसमायुक्ताभर्तृशोकेनपीडिताः ॥२०२॥ मृगस्तासांवचःश्रुत्वाहृदिचिंतापरोऽभवत् ॥ गंतव्यंवानगंतव्यंमयाव्याधस्यमंदिरं ॥ २०३॥ एकतःसत्यसंरक्षाकुटुंबस्यक्षयोऽन्यतः ॥ यदिगच्छामितत्राहंकुटुंबस्यक्षयोभवेत् ॥ तदंतिकंनचेद्यामिममसत्यंक्षयंव्रजेत् ॥ २०४ ॥ ॥

कीं, आपण व्याधाचे घरीं जावें किंवा न जावें ॥ २०३ ॥ गेलों तर एके अर्थीं सत्याचें संरक्षण होईल पण दुसऱ्या बाजूनें कुटुंबाचा क्षय होईल, ह्मणजे जर जाईन तर कुटुंबाचा क्षय, आणि जर न जाईन तर सत्यापासून भ्रष्ट होईन ॥ २०४ ॥

पुत्राला, स्त्रियेला किंवा स्वतःला मृत्यु आला तरी श्रेष्ठ आहे, परंतु सत्याचा लोप झाला तरमात्र तो मनुष्य कल्पपर्यंत रौरव नरकांत जाईल ॥ २०५ ॥ याकरितां आपलें कल्याण व्हावें असी ज्यांची इच्छा असेल त्यांनीं सर्वदा सत्य पाळावें. पृथ्वी सत्यानें राहते, सूर्य सत्यानें तेजस्वी राहतो ॥ २०६ ॥ वायु सत्यानें वाहतात, सत्यामध्यें सर्व कांहीं आहे.

वरंपुत्रस्यमरणंभार्यायाआत्मनोपिच ॥ सत्यलोपान्नरोनूनमाकल्पंरौरवं व्रजेत् ॥ २०५ ॥ तस्मात्सत्यंपालनीयंनरैःश्रेयोर्थिभिःसदा ॥ सत्येनधार्यतेपृथ्वीसत्येनतपतेरविः ॥२०६॥ सत्येनवायवोवांतिसत्येसर्वंप्रतिष्ठितं ॥ एवंसंचिंत्यहरिणोधर्मान्हृदिमनोरमान् ॥ २०७ ॥ ताभिःसहैवशनकैर्लुब्धकस्याश्रमंययौ ॥ तस्मिन्सरसिसस्नात्वाकर्मन्यासंचकारह ॥ २०८ ॥

याप्रमाणें मनामध्यें धर्मासंबंधानें मनोहर विचार करून ॥ २०७ ॥ स्त्रियांसहवर्तमान तो हरिण व्याधाचे घरीं गेला. जातांना पूर्वीच्या सरोवरांत स्नान करून त्यानें सर्व कर्मांचा संन्यास ( त्याग ) केला. ॥ २०८ ॥

आणि हृदयामध्यें शंकराचें ध्यान करीत त्या लिंगाला नमस्कार करून स्नान, खाणें, पिणें, विषयभोग वगैरे टाकून ॥ २०९ ॥ तसेंच काम, क्रोध, लोभ व मोक्षमार्गाला आड येणारी माया टाकून आणि खाद्य, पेय सर्व टाकून व्याधाचे घरीं गेला ॥ २१० ॥ त्याच्या

तल्लिंगंप्रणिपत्याशुहृदिध्यायन्सदाशिवं ॥ स्नानंपानंपरित्यज्यमैथुनंभोग मेवच ॥ २०९ ॥ कामंक्रोधंतथालोभंमायांमोक्षविनाशिनीं ॥ खाद्यपेया दिकंसर्वंलुब्धकाभिमुखंययौ ॥ २१० ॥ तस्यभार्याश्चपुत्राश्चमरणेकृत निश्चयाः ॥ अनशनव्रतंगृह्यपृष्ठलग्नास्तमन्वयुः ॥ २११ ॥ भार्यापुत्रैःप रिवृतोमृगस्तंदेशमागतः ॥ क्षुधितैर्बालकैर्युक्तोलुब्धकोयत्रतिष्ठति ॥ पा लयन्सत्यवाक्यानिलुब्धकंवाक्यमब्रवीत् ॥ २१२ ॥ ॥

स्त्रिया पुत्र वगैरे सर्वांनीं मरणाचा निश्चय करून अनशनव्रत करून ते सर्व त्याच्या पाठीमागून गेले ॥ २११ ॥ तात्पर्य सत्य पाळण्यासाठीं क्षुधाक्रांत झालेल्या त्या स्त्रियापुत्रां- सहवर्तमान तो हरिण, व्याध राहत होता तेथें गेला ॥ २१२ ॥

आणि तो हरिण ह्मणतो हे व्याधा, पहिल्यानें मला मार, नंतर स्त्रियांला व त्यानंतर ह्या मुलांला अशा क्रमानें मार, आतां उशीर करूं नको ॥ २१३ ॥ हे व्याधा, मृगांला मारलेंस ह्मणून तुला कांहीं दोष नाहीं. आह्मी मात्र सत्यानें पवित्र होऊन स्वर्गास जाऊं यांत

मृगउवाच ॥ ॥ जहिमांप्रथमंव्याधपश्चाद्भार्याःक्रमेणमे ॥ बालकानि ततःपश्चाद्धन्यंतांमाविलंबय ॥ २१३ ॥ मृगाणांहननाद्व्याधनतेदोषोस्तिकश्चन ॥ यास्यामश्चवयंस्वर्गंसत्यपूतानसंशयः ॥ २१४ ॥ तवापिस कुटुंबस्यप्राणयात्राभविष्यति ॥ श्रुत्वैवंबहुधात्मानंविनिंद्यलुब्धकोब्रवीत् ॥ २१५ ॥ ॥ व्याधउवाच ॥ अहोमृगमहासत्वगच्छगच्छस्वमाश्रमं ॥ आमिषेणनमेकार्यंयद्भाव्यंतद्भविष्यति ॥ २१६ ॥ ॥

संशय नाहीं ॥ २१४ ॥ आह्मांला मारल्यानें सकुटुंब तुझा चरित्रार्थ होईल. हें ऐकून अनेक प्रकारें आपली निंदा करीत तो व्याध मृगाला ह्मणतो ॥ २१५ ॥ व्याध ह्मणतो हे मृगा, हे सत्यपालका, जा जा तूं आपले घरीं. मांसाचें मला प्रयोजन नाहीं. जें व्हायचें असेल

तें होईल ॥ २१६ ॥ प्राण्यांला धरणें, त्याला त्रास देणें किंवा त्यांचा घात करणें यात मोठें पाप आहे तरी तें मी कुटुंबाच्या निर्वाहासाठीं कधीं करणार नाहीं ॥ २१७ ॥ दया हें धर्मतरूचें मूळ आहे. सत्य हें त्याच्या शाखा व दम हें त्याचें फळ आहे. हे हरिणश्रेष्ठा, धर्मांचा

सत्वानांघातनेपापंबंधनेतर्जनेतथा ॥ नैवपापंकरिष्यामिकुटुंबार्थेकदाचन ॥ २१७ ॥ धर्मतरोर्दयामूलंसत्यंशाखाफलंदमः ॥ त्वंगुरुर्ममधर्माणामुपदेष्टामृगोत्तम ॥ २१८ ॥ गच्छगच्छमृगश्रेष्ठकुटुंबेनसमन्वितः ॥ मयात्यक्तानिशस्त्राणिसत्यधर्मःसमाश्रितः ॥ २१९ ॥ ॥ मृगउवाच ॥ कर्मन्यासमहंकृत्वात्वत्सकाशमिहागतः ॥ हन्यतांहन्यतांशीघ्रंनतेपापंभविष्यति ॥ २२० ॥ ॥ ॥

उपदेश करणारा तूं माझा गुरु आहेस ॥२१८॥ मृगश्रेष्ठा, जा जा तूं कुटुंबपरिवारासह आपल्या घरीं. हीं पाहा मी आजपासून शस्त्रास्त्रें टाकलीं आणि सत्य धर्मांचा आश्रय केला ॥२१९॥ मृग ह्मणतो मी सर्व कर्मांचा त्याग करून तुझ्याजवळ आलों आहें, मार मार लौकर, तुला

पाप लागणार नाहीं ॥ २२० ॥ मी येतों ह्मणून तुला शब्द दिला त्याणें मी बद्ध आहें. आतां घरीं जाणार नाहीं. कुटुंबासहवर्तमान मी जीविताचा मोह सोडून दिला ॥ २२१ ॥ हें ऐकून पुनः व्याध ह्मणतो हे मृगा, माझा गुरु, पिता, माता, बंधु, सखा, सोहिरा सर्व

मयादत्तापुरावाक्तेतयाबद्धोनयाम्यहं ॥ मयासहकुटुंबेनत्यक्तोमोहःस्व जीविते ॥ २२१ ॥ ॥ व्याधउवाच ॥ त्वंगुरुस्त्वंपितामातात्वंमेबंधुःस खासुहृत् ॥ मयात्यक्तानिशस्त्राणित्यक्तंमायादिकंबलं ॥ २२२ ॥ कस्य भार्यासुताःकस्यकुटुंबंकस्यवामृग ॥ तैस्तैःस्वकर्मभोक्तव्यंमृगगच्छयथा सुखं ॥ २२३ ॥ इत्युक्त्वालुब्धकस्तूर्णंबभंजसशरंधनुः ॥ मृगंप्रदक्षिणी कृत्यनमस्कृत्यक्षमापयत् ॥ २२४ ॥ ॥

तूं आहेस. मी सर्व शस्त्रें टाकलीं, मायिकबळ सर्व टाकलें ॥ २२२ ॥ हे मृगा, कोणाची भार्या, कोणाचे मुलगे व कुटुंब कोणाचें त्यांनीं आपापलें कर्म भोगावें. मृगा, तूं यथेच्छ जा ॥ २२३ ॥ असें बोलून त्या व्याधानें बाणासह धनुष्य तत्काल मोडून टाकलें, व

मृगाला प्रदक्षिणा, नमस्कार करून आपण त्रास दिल्याबद्दल क्षमा मागितली ॥ २२४ ॥ आणि त्याच्या पुढ्यांतच मोठ्या प्रेमानें अमृतासारखें मधुर भाषण केलें. एवढ्यांत स्वर्गांवर देवांनीं दुंदुभी वाजविले ॥ २२५ ॥ आकाशांतून पुष्पवृष्टि होऊं लागली, आणि देवांचे

प्राहप्रीत्यापुरस्तत्रवचःपीयूषसंनिभं ॥ एतस्मिन्नंतरेनेदुर्देवदुंदुभयोदिवि ॥ २२५ ॥ आकाशात्पुष्पवृष्टिश्चपपातसुमनोहरा ॥ देवदूताःसमायाता विमानंगृह्यशोभनं ॥ २२६ ॥ ॥ देवदूताऊचुः ॥ अहोव्याधमहासत्वसर्व सत्वभयंकर ॥ विमानमिदमारुह्यसदेहस्त्रिदिवंव्रज ॥२२७॥ शिवरात्रिप्र भावेणपातकंतेक्षयंगतं ॥ उपवासस्तुसंजातोनिशिजागरणंतथा ॥२२८॥

दूत उत्तम विमान घेऊन आले ॥ २२६ ॥ देवदूत ह्मणतात, हे सत्वशीला, हे सर्वप्राणि- भयंकरा व्याधा, या विमानांत बसून या शरीरासह स्वर्गास जा. ॥ २२७ ॥ शिवरात्रिव्र- ताच्या प्रभावानें तुझें सर्व पाप क्षयाला गेलें. तुला शिवरात्रीदिवशीं उपोषण घडलें, रात्रौ

जागरण घडलें ॥ २२८ ॥ अज्ञानानें कां होईना, दर प्रहरीं शिवाची यामपूजा घडली त्यायोगानें तूं सर्व पापांपासून मुक्त झालास, आतां कैलासाला जा ॥२२९॥ हे मृगराजा, हे सत्वशीला, तूं तिघी स्त्रिया व पुत्र यांसहवर्तमान नक्षत्रपदाला जा. तें नक्षत्र तुझ्या नांवानें

यामेयामेकृतापूजाअज्ञात्वापिशिवस्यच ॥ सर्वपापविनिर्मुक्तोगच्छत्वंरुद्र मंदिरं ॥ २२९ ॥ मृगराजमहासत्वनिजपुत्रसमन्वितः ॥ भार्यात्रित यसंयुक्तो नाक्षत्रंपदमाप्नुहि ॥ तवनाम्नातदृक्षंतुलोकेख्यातिंगमिष्यति ॥ २३० ॥ एतच्छ्रुत्वातुवचनंलुब्धकोथमृगास्तथा ॥ विमानानिसमारु ह्यनाक्षत्रंपदमागताः ॥ २३१ ॥ हरिणीद्वयमार्गस्तुदृश्यतेऽद्यापिपार्वति ॥ तत्पृष्ठलग्नंताराणांद्वितयंमणिसंनिभं ॥ २३२ ॥ ॥

( मृगशीर्ष ह्मणून ) प्रसिद्ध होईल ॥२३०॥ हें देवदूताचें भाषण ऐकून तो व्याध व हरिण विमानांत बसून नक्षत्रलोकाला गेले ॥ २३१ ॥ हे पार्वति त्या दोन हरिणींचा मार्ग तर अद्यापि दिसतो व त्याच्या पृष्ठभागीं मण्यासारखीं दोन नक्षत्रें ॥ २३२ ॥

लुब्धक नांवाचीं मोठीं तेजःपुंज व ज्याखालीं तीन नक्षत्रें आहेत त्याला मृगशीर्ष असें ह्मणतात ॥२३३॥ अग्रभागीं दोन बालक, पृष्ठभागीं तिसरी मृगी मृगशीर्षांजवळ आलेला असा हा मृगराजा अद्यापि आकाशांत विराजमान दिसतो ॥ २३४ ॥ व्याधाला शिवरात्री-

ऋक्षंतुलुब्धकंनामदृश्यतेद्योतनंशुभं ॥ तारात्रितयसंयुक्तंमृगशीर्षंतदु च्यते ॥ २३३ ॥ बालकद्वितयंचाग्रेतृतीयापृष्ठतोमृगी ॥ पृष्ठतस्तत्रसंप्रा प्तामृगशीर्षस्यसंनिधौ ॥ मृगराड्दृश्यतेद्यापिऋक्षंव्योमगमुत्तमं ॥२३४॥ अकामाज्जागरंरात्रौतथोपोषणपूजनं ॥ जातंलुब्धकराजस्यतत्फलंपरि वर्णितं ॥ २३५ ॥ येनराभक्तिभावेनशिवरात्रिव्रतंशुभं ॥ सोपवासंकरि ष्यंतिजागरेणसमन्वितं ॥ २३६ ॥ ॥ ॥

दिवशीं सहजीं घडलेलें उपोषण व रात्रौ जागरण, व शिवपूजनही घडलें त्याचें फळ सांगि- तलें ॥ २३५ ॥ सहजीं घडलेल्या व्रताचें जर एवढें फळ तर मग जे लोक भक्तिभावानें शुभकारक असें शिवरात्रीचें व्रत विधिपूर्वक उपोषण जागरणासह करतात ॥ २३६ ॥

त्याचें फल सागण्याला ब्रह्मदेवसुद्धां अज्ञानी होतो. शिवरात्रीसारखें पापभय दूर करणारें दुसरें व्रत नाहीं ॥ २३७ ॥ सहस्र अश्वमेध केल्याचें व शंभर वाजपेय यज्ञ केल्याचें जेवढें फळ तें या शिवरात्रिव्रतानें प्राप्त होतें यांत संशय नाहीं ॥ २३८ ॥ माघमासीं प्रयागांत स्नान करणारांला जें फळ, व वैशाखांत द्वारवतींत स्नान करणारांला जें फळ, तपसि ( ब्रह्म-

तेषांफलंप्रियेवक्तुंब्रह्मापिचजडायते ॥ शिवरात्रिसमंनास्तिव्रतंपापभयापहं ॥ २३७ ॥ अश्वमेधसहस्रेणवाजपेयशतेनयत् ॥ प्राप्नोतिततत्फलंसर्वंनात्रकार्याविचारणा ॥ २३८ ॥ यत्फलंमाघमासेवैप्रयागेमज्जतांनृणां ॥ वैशाखेद्वारवत्यांचतपस्याषाढसेवनात् ॥ २३९ ॥ गयायांपिंडदानेनकार्तिकेमाधवाग्रतः ॥ तत्फलंजायतेनूनंश्रवणादस्यपार्वति ॥ २४० ॥ इति श्रीलिंगपुराणेशिवरात्रिव्रतकथासंपूर्णा ॥ ॥

चाऱ्यानें ) पालाशदंड घेतला असतां जें फल ॥ २३९ ॥ कार्तिकामध्यें माधवासमोर गयेस जाऊन विष्णुपदावर पिंड दिल्याचें जें फल तें सर्व फळ, हे पार्वति, शिवरात्रिव्रत करणाराला खरोखर प्राप्त होईल ॥ २४० ॥ इति श्रीलिंगपुराणे शिवरात्रिव्रतकथा संपूर्णा ॥

हें पुस्तक वे. शा. वासुदेवशास्त्री पणशीकर यांनीं तयार केलें. तें मुंबईमध्यें
" निर्णयसागर " छापखान्याचे मालक तुकाराम जावजी
यांनीं आपल्या छापखान्यांत छापून प्रसिद्ध केलें.
शके १८३४ सन १९१३.



Published by Tukaram Javaji, Proprietor N. S. Press, 23, Kolbhat Lane, Bombay.
Printed by R. Y. Shedge at the N. S. Press, 23 Kolbhat Lane, Bombay.

